**जिल्हा परिषदेकडे प्रतिनियुक्तीने कार्यरत असलेल्या शालेय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील कर्मचाऱ्यांचे वेतन सेवार्थ प्रणालीमधून अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक : संकीर्ण २४१५/प्र.क्र.३२/१५/प्रशा-५**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- १४ नोव्हेंबर, २०१८

वाचा:- १. शासन निर्णय क्रमांक. राप्रौशि/-२०००-(१२४/२०००)/ साशी-२ दि. २३ नोव्हेंबर, २०००
२. शासन निर्णय, ग्रा.वि.व पं.रा. विभाग, क्र. सेवार्थ२०१२/प्र.क्र.१५६/आस्था-११, दिनांक १९.११.२०१२

**प्रस्तावना :**

शालेय शिक्षण विभागाकडील प्रौढ शिक्षण (निरंतर शिक्षण) ही योजना जिल्हा परिषदेकडे हस्तांतरीत करण्यात आलेली आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणी करीता शिक्षणाधिकारी (निरंतर शिक्षण) कार्यालयातील गट 'क' व गट 'ड' चे आकृतीबंधामध्ये मंजूर असलेले शासकीय कर्मचारी प्रतिनियुक्तीने जिल्हा परिषदेकडे काम करत आहेत. त्यांचे सनियंत्रक अधिकारी **मुख्य कार्यकारी अधिकारी** जिल्हा परिषद हे आहेत. त्यामुळे शिक्षणाधिकारी (निरंतर शिक्षण) कार्यालयातील गट -क व गट -ड च्या शासकीय कर्मचाऱ्यांचे वेतनाचा खर्च व इतर खर्चाबाबत मुख्य लेखा व वित्त अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहत आहेत. या खर्चासाठी शालेय शिक्षण विभागाकडून अनुदान जिल्हा परिषदांना देण्यात येते.

२. या विभागांतर्गतच्या शासकीय कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते यांची देयके “सेवार्थ” वेतन प्रणालीद्वारे अदा करण्यात येतात. त्याचप्रमाणे ग्राम विकास विभागाच्या अधिपत्याखालील जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते यांची देयके “पंचायत राज सेवार्थ” प्रणाली द्वारे अदा केली जातात.

३. आतापर्यंत जिल्हा परिषदेमध्ये प्रतिनियुक्तीने कार्यरत असणाऱ्या शिक्षणाधिकारी (निरंतर शिक्षण) कार्यालयातील कर्मचाऱ्यांची वेतन देयके “off-line” पध्दतीने जिल्हा परिषदेच्या वित्त विभागाकडून पारित करून वितरित करण्यात येत होती. तथापि आता जिल्हा परिषदेतील कर्मचाऱ्यांची वेतन व भत्यांची देयके पंचायत राज सेवार्थ या संगणकीकृत प्रणालीद्वारे करण्याचा निर्णय ग्रामविकास विभागने घेतलेला असून, केवळ संगणकीय प्रणालीद्वारे कर्मचाऱ्यांचे वेतन अदा

करण्याच्या वित्त विभागाच्या सूचनांनुसार कोषागार कार्यालयाद्वारे प्रचलित “off-line” पध्दतीने देयक स्वीकारण्यास नकार दिलेला आहे. त्यामुळे जिल्हा परिषदेकडे प्रतिनियुक्तीने/ बदलीने कार्यरत असणाऱ्या शिक्षणाधिकारी (निरंतर शिक्षण) कार्यालयातील गट -क व गट -ड संवर्गातील कर्मचाऱ्याची वेतन व भत्ते यांची देयके अदा करण्यामध्ये अडचणी निर्माण झालेल्या आहेत.

४. सद्य: स्थितीत ग्राम विकास विभागाच्या पंचायत राज सेवार्थ प्रणालीमध्ये जिल्हा परिषदेमध्ये प्रतिनियुक्तीने कार्यरत असलेल्या या विभागाच्या कर्मचाऱ्यांच्या वेतनासंदर्भात कोणतीही सूविधा उपलब्ध नाही. तसेच सेवार्थ प्रणालीमधून पंचायत राज सेवार्थ प्रणालीमध्ये पद हस्तांतरीत करण्याची कोणतीही तांत्रिक सोय सद्य:स्थितीत उपलब्ध नाही. सेवार्थ व पंचायत राज सेवार्थ या दोन्ही प्रणाली पुर्णत: वेगळया असल्याने बदलीने/ पदोन्नतीने हजर झालेल्या कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते याबाबतची देयके अदा करताना तसेच त्यांचे वेतनातून DCPS व इतर संबंधित रकमा कपात करण्यामध्ये अनेक तांत्रिक अडचणी निर्माण होतील. त्यामुळे ज्याप्रमाणे शिक्षणाधिकारी (निरंतर), जिल्हा परिषद, सर्व कार्यालयातील गट -अ व गट -ब च्या अधिकाऱ्यांचे वेतनाबाबत अनुदान उपलब्ध करुन सेवार्थ मध्ये देयके तयार करून जिल्हा कोषागाराकडून आहरित करण्याची कार्यवाही केली जाते. त्याप्रमाणे जिल्हा परिषदेकडे या विभागातील प्रतिनियुक्तीने कार्यरत असणाऱ्या (पदोन्नतीने / बदलीने हजर झालेल्या) कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्त्यांच्या बाबतीत देखील सेवार्थ प्रणालीमधून देयक आहरित करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

राज्यातील सर्व जिल्हा परिषदांमधील शिक्षणाधिकारी (निरंतर शिक्षण) कार्यालयातील गट -अ व गट -ब मधील अधिकाऱ्यांच्या वेतनाबाबत जसे अनुदान उपलब्ध करुन सेवार्थ मध्ये देयके तयार करुन जिल्हा कोषागाराकडून आहरित करण्याची कार्यवाही केली जाते. त्याप्रमाणेच जिल्हा परिषदेकडे या विभागातील प्रतिनियुक्तीने कार्यरत असणाऱ्या गट -क व गट -ड संवर्गातील सर्व (पदोन्नतीने/बदलीने हजर झालेल्या) कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्त्यांच्या बाबतीत देखील सेवार्थ प्रणालीमधून देयके आहरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत शासन आदेश ग्राम विकास विभागाच्या व वित्त विभागच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे. वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१७/कोषा-४ दिनांक२१-०६-२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. प्रस्तुत शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१८१११४१५१४२०२०२१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2018.11.14 15:20:40 +05'30'

(र. प्र. आटे)

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
२. संचालक, अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे -१
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
४. विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व)
५. शिक्षणाधिकारी (निरंतर शिक्षण) जिल्हा परिषद (सर्व)
६. उप सचिव (कोषा प्र-४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. उप सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर १/२
९. जिल्हा कोषागार अधिकारी,( सर्व )
१०.निवड नस्ती.